**श्री. जयंती नरसी सोलंकी, बडतर्फ सफाईगार, राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय, यांना लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन अधिसूचना सन २००५ मधील तरतुद शिथील करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. न्यायाप्र-अनौस-१४/प्र.क्र.३४५/१२/२०-अ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २० जुलै, २०१७

वाचा:- १) राज्यपालांचे परिवार प्रबंधक यांचे आदेश क्र. रापप्र/लेअ/नियुक्ती/२०१२/१७४३, दि. ०९.०३.२०१२.
२) राज्यपालांचे परिवार प्रबंधक यांचे आदेश क्र. रापप्र/लेअ/२०१२/५५३, दि. ०५.०७.२०१२.
३) सामान्य प्रशासन विभाग/कार्या-८ चे पत्र क्र. अकंपा-१२१६/प्र.क्र.२७७/का-८, दि. २९.१२.२०१६.

**प्रस्तावना:-**

श्री. जयंती नरसी सोलंकी यांना राज्यपालांचे परिवार प्रबंधकांच्या दि. ०९.०३.२०१२ च्या आदेशान्वये दि. ०१.०३.२०१२ पासून अनुकंपा तत्वावर राज्यपालांचे परिवार प्रबंधक यांच्या कार्यालयात "सफाईगार" या पदावर नियुक्ती देण्यात आली होती. श्री. सोलंकी यांच्या कुटुंबाचा तपशिल प्राप्त करुन घेण्यात आला असता त्यांना एकूण ४ अपत्ये हयात असून दि. २८.०३.२००५ नंतर जन्मलेली दोन पेक्षा अधिक अपत्ये हयात असल्याचे लक्षात आले. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि. २८.०३.२००५ नुसार दोनपेक्षा जास्त आपत्ये असलेल्या उमेदवारांना शासन सेवेत नियुक्ती देण्यास प्रतिबंध करण्यात आला आहे. त्यामुळे दि. ०५.०७.२०१२ पासून त्यांना सेवेतून बडतर्फ करण्यात आले. त्याविरुद्ध श्री. सोलंकी यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. २६७३/२०१२ मध्ये दि. ३१.०८.२०१६ रोजी मा.उच्च न्यायालयाने, महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम, २००५ च्या नियम ३ मधील लहान कुटुंबाची अट, नियम ६ नुसार शिथिल करण्याबाबतच्या श्री. सोलंकी यांच्या अर्जावर आठ आठवड्यात निर्णय घ्यावा असे आदेश दिले होते.

२. त्यानुषंगाने, श्री. सोलंकी यांच्याकडून प्राप्त अर्जाच्या अनुषंगाने प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १२.०२.२००१ च्या परिपत्रकान्वये गठीत, मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील वरिष्ठ सचिव समितीसमोर सामान्य प्रशासन विभागाचे कार्यासन-८ मार्फत ठेवण्यात आला होता.

३. दि. २३.१२.२०१६ रोजी झालेल्या वरिष्ठ सचिव समितीच्या बैठकीमध्ये श्री. जयंती नरसी सोलंकी, बडतर्फ सफाईगार, राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, मुंबई यांना महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम, २००५ मधील लहान कुटुंबाची अट शिथील करुन शासन सेवेमध्ये परत सामावून घेण्याबाबत शिफारस करण्यात आली आहे.

**शासन निर्णय:-**

वरिष्ठ सचिव समितीची शिफारस विचारात घेऊन, श्री. जयंती सोलंकी यांना, शासन सेवेतील नियुक्तीसाठी असलेली लहान कुटुंबाची अट, महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम, २००५ मधील नियम ६ अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार, पुढील अटीच्या अधीन राहून, विशेष बाब म्हणून शिथिल करण्यात येत आहे:-

**"श्री. सोलंकी यांचा सेवा समाप्तीपासून सेवेत परत घेईपर्यंतचा कालावधी हा कोणत्याही सेवा प्रयोजनार्थ जमेस धरण्याची मागणी करणार नाही असे हमीपत्र श्री. सोलंकी यांच्याकडून प्रथम घेण्यात यावे."**

२. राज्यपालांचे सचिव यांनी श्री. सोलंकी यांना उक्त नमूद अटीवर सेवेत परत घेण्याबाबत पुढील कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय दि. २३.१२.२०१६ रोजीच्या वरिष्ठ सचिव समितीच्या बैठकीतील शिफारशीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२०१७१२३९२९०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने

Satish K Jondhale

Digitally signed by Satish K Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish K Jondhale
Date: 2017.07.24 13:11:52 +05'30'

**( सतिश जोंधळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
४. राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन, मलबार हिल, मुंबई
५. प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-८
८. श्री. जयंती नरसी सोलंकी, बडतर्फ सफाईगार, राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, मुंबई ( राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालयामार्फत )
९. निवड नस्ती. (२ प्रती)